नवनाथ भक्तिसार    अध्याय सतरावा

गत अध्यायात नाथपंथाचे दोन महागुरू मच्छिंद्रनाथ आणि जालिंदरनाथ यांच्या शिष्यांमध्ये म्हणजे गोरक्षनाथ आणि कानिफनाथ यांच्यामध्ये गुरूंच्या श्रेष्ठत्वावरून आणि त्यांच्याकडून प्राप्त झालेल्या महान विद्येच्या श्रेष्ठत्वाबद्दल नाहक वादावादी झाली पण त्यातून दोघा शिष्यांना आपापले गुरु कुठे आहेत याचे गूढ उकलले. त्या अनुषंगाने जालिंदरनाथांचा शिष्य कानिफा गौड बंगाल येथील हेलापट्टण नगरीस निघाले आणि मच्छिंद्रनाथांचे शिष्य गोरक्ष स्त्री राज्याकडे रवाना झाले. कानिफनाथ, हेलापट्टण नगरीतील अरण्यात वास्तव्यास राहिले आहेत.

तहत अकारा वर्षे जालिंदरनाथ हेलापट्टण नगरीतील भूमीच्या उदरात आहेत. त्यांना दृश्यमान करावयाचे आणि राजा गोपीचंदालाही अभय द्यावयाचे. अशी किमयागिरी कानिफनाथांना करावयाची आहे. राजा गोपीचंदास मातोश्री मैनावतीने कानिफनाथांकडून अभय मिळाले असल्याचे कळविले होते. तसा दिलासा मिळाला तरीही अपराधी भावनेपोटी राजा गोपीचंदास रात्रभर झोप मात्र लागली नाही. सकाळी कानिफनाथांच्या शिबिरात जाऊन त्यांचे चरणस्पर्श केले आणी हात जोडून राजा अधोवदन उभा राहिला. नाथांनी त्यास विचारले, “राजा गोपीचंद, गुरुमहाराज कोणत्या ठिकाणी आहेत ते स्थान आम्हास दाखव.” त्यावर “चालावे स्वामीजी, ठिकाण दाखवतो.” असा राजा म्हणाला.

“माझा शिष्य सोबत नेऊन त्याला दाखव.”

“जशी आज्ञा!” असे म्हणून एका शिष्याला नेऊन, ते ठिकाण दाखवून राजा परत आला. “गुरु महाराज; राजाबरोबर जाऊन ते स्थळ अवलोकन करून आलो आहे.” असे शिष्याने सांगितले.

नंतर नाथांनी विचारणा केली, “राजन, श्रीगुरुंना बाहेर कसे काढायचे?” तेव्हा राजा म्हणाला; स्वामी! आपण समर्थ आणि जाणकार आहात. आमच्या सारख्या अनभीज्ञांनीने काय सुचवावे? माता, पिता, गुरु सर्व काही आपणच असून मारा अथवा तारा, सर्व आपणांवरच अवलंबून आहे. मी आपल्या चरणांचा दास आहे. नाथांना अतिशय चतुराईने श्री गुरूंना गर्तेतून वर काढायचे होते. आणि गोपीचंदाचे प्राणही वाचवायचे होते, ते म्हणाले, “आता तुझ्या प्राणाच्या रक्षणासाठी मी सांगतो त्याप्रमाणे कृती कर; सोने, रूपे, तांबे, पितळ, लोखंड या धातूंचे हुबेहूब तुझ्यासारखे पाच पुतळे बनवून आण.” हे ऐकताच राजाने दूत रवाना करून सोनार, लोहार, तांबट ई. कसबी कारीगारांना आमंत्रित केले. उपरोक्त धातू मागविले, कुशल कारीगारांनी आपली कसब पणाला लावून मेणाची हबेहूब प्रतिकृती तयार करून नाथांच्या निरीक्षनास्तव सादर केली. त्याचा साचा बनिवला, धातू वितळविले आणि साच्यात ओतले, अशा प्रकारे पाच धातूंच्या पुतळ्यांतून जणू पाच प्रती गोपीचंदच उभे राहिले.

कानिफनाथांनी राजा गोपीचंदाच्या कुंडलीप्रमाणे शुभदिन, शुभवेळ, पाहून त्या पुतळ्यांसह राजाला घेऊन त्या ठिकाणी निघाले, जाताना राजाला म्हणाले, “राजा! हुशारीने कार्य करावे. चुका करू नयेत. मी स्वतः खड्याच्या कठावर राहून तुझे रक्षण करणार आहे. तू प्रथम सुवर्ण पुतळा घेऊन खड्ड्यात उतरावे. मध्यभागी पुतळा ठेवून कुदळीने खोदकाम करावयाचे आतून श्री गुरु नाव विचारतील. तेव्हा नाव सांगून चपळाईने क्षणात खड्ड्यबाहेर पडले पाहिजे. असे पाच वेळा करावे लागणार आहे.” असे सांगून नाथांनी त्याच्या कपाळावर चिरंजीव प्रयोगाने सिद्ध केलेले भस्म मंत्रून लावले. त्याला सुवर्ण पुतळ्यांसह खड्ड्यावर सोडले. राजाने कुदळीने खणताच आतून विचारणा झाली. “कोण घाव घालीत आहे? नाव सांगावे.

“मी त्रिलोचन पुत्र; गोपीचंद,: असे म्हणून राजाने जीवाच्या भयाने सर्व बळ एकवटून बाहेर उसळी मारली. भूमीतून उच्चारल्या गेलेल्या शापवाणीने सुवर्णपुतळा धडाडून पेटला आणि जाळून खाक झाला. दुसरा पुतळा घेऊन राजा पुन्हा उतरला आणि खणू लागला. आतून पुन्हा आवाज आला. “कोण आहे रे? नाव सांग.” “मी गोपीचंद!” असे उत्तर देऊन राजाने बाहेर उडी मारली. जालिंदरनाथांच्या शापवाणीने दुसरा पुतळाही क्षणात भस्म झाला. अशा प्रकारे तिसरा, चौथा आणि पाचवा असे सर्व पुतळे जाळून खाक झाले.

साहव्या वेळेस कानिफनाथांनी एक युक्ती सांगून राजाला पुन्हा खड्ड्यात सोडले. भूमीच्या खोल गर्तेत जालिंदरनाथ विचारात होते की, “माझा एक ही शाप निष्फळ जात नाही मग पाच वेळा गोपीचंद कसा बचावला? कराल काळाच्या दाढेतून, साक्षात शापाग्नीतून वाचला यांचे आश्चर्य वाटते. विषारी नागाने दंश केल्यावर, हिरकणी चावून खाल्ल्यावर, गरुडाने सर्पावर झडप घातल्यावर, माथ्यावर पर्वतकडा कोसळल्यावर कुणी वाचू शकत नाही. ज्या अर्थी राजा गोपीचंद वाचला, त्याअर्थी प्रत्यक्ष भगवंतानेच त्याचे रक्षण केले असावे. असो! देव तारी त्याला कोण मारी? इतक्या वेळा वाचलाच आहे तर आता पुन्हा आल्यास अमर करून टाकू.”

गोपीचंद राजाने सहाव्या वेळी कुदळीने खणण्यास सुरवात केली. आतून विचारणा झाली. “अद्यापपर्यंत कोण घाव घालत आहे?” यावेळी राजा उत्तर देण्यासाठी अगोदर कानिफनाथ म्हणाले, “गुरुदेव मी आपला शिष्य कर्ण कानिफ आहे. आपल्या दर्शनाचा भुकेला आहे, व्याकूळ झालो आहे. तुम्हाला बाहेर काढण्यासाठी माझ्या सांगण्यावरून गोपीचंद खोदतोय.” शिष्य कानिफाचे बोल ऐकून, राजा कशामुळे वाचला, याचा उलगडा झाला. त्यांनी प्रसन्न होऊन गोपीचंदास आशीर्वाद दिला. “चिरंजीव भः सूर्यचंद्र असेपर्यंत चिरंजीव होवो.” पुढे म्हणाले; “वत्सा कानिफा! मला लवकर बाहेर काढ. तुझ्या भेटीसाठी जीव आतुर झाला आहे.” मग सर्व मजुरांकरवी भाराभर खड्डा खोदून वज्रकवचापर्यंत उकरण्यात आला. कुदालीच्या घावने वज्राची खण् खण् आवाज ऐकुन श्रीगुरु म्हणाले, “आता बस करा आणि दूर व्हा.” सर्वजण दूर होताच शक्रास्त्राने वज्रकवच भेदून ते प्रकट झाले. खड्ड्यातून बाहेर आले. कानिफनाथाला हृदयाशी कवटाळून दृढ आलिंगन दिले. नेत्रातून आनंदाश्रू बरसले, म्हणाले, “कानिफा तू होतास म्हणून राजा गोपीचंद वाचला, कुठे आहे तो? पाहतात तर राजा त्यांच्या पायावर लोळण घेत आहे. त्याला उठवून म्हणाले, “उठ वत्सा! प्रलयाग्नीतून बचावला आहेस.” आता सूर्यचंद्र असे पर्यंत तू अमर आहेस.” राजमाता मैनावती गुरुमहाराजांच्या चरणांवर माथा ठेवून अनावर अश्रूंनी चरण धूत होती. हात जोडून म्हणाली. “गुरुजी! अकरा वर्षे मला अंधःकारात टाकून गेला होतात. सूर्यविकासी कमळाने सूर्योदयाची प्रतीक्षा करावी तशी मी आपली वाट बघत होते चकोराने चंद्राची, चातकाने मेघाची आतुर होऊन प्रतीक्षा करावी, तशी मी आतुर होऊन तळमळत होते. अकरा वर्षे माझा ब्रह्मठेवा, माझी आंधळ्याची काठी हरविली होती. गुरु माउली आता अंतर देऊ नका!! असे म्हणून हंबरडा फोडून रडू लागली. तिच्याजवळ जाऊन नाथांनी तिचे अश्रू पुसले. त्यानंही अश्रू आवरत नव्हते. तिघा लेकरांना आपल्या मिठीत घेऊन अग्नीपुत्र जालिंदरनाथ अतिशय सुखावले. त्यांनी गोपीचंदाला विचारले, “पुत्रा तुझी काय इच्छा आहे? राजवैभव भोगणार की राजयोग स्वीकारणार? अशाश्वत आणि शाश्वत असे दोन पर्याय तुझ्यासमोर तुला आवडेल त्याची निवड कर. मी तर तुला अमर केले आहे, पण राजवैभव अमर नाही. ते फसवे मृगजळ आहे. अपार संपत्तीला सुद्धा एक दिवस शेवट आहे. सर्व नाशवंत आहे. यापूर्वी अनेकांनी राजमार्ग सोडून शाश्वत योगमार्गाचा स्वीकार केला आहे. परंतु योग सोडून मायावी वैभवात परत कुणी गेले नाही.

विश्वामित्र वैभवशाली राज्य सोडून योग तपस्वी झाला, राजपुत्र ध्रुवाने तर बालवयातच मायावी राजवैभव सोडून अढळपदी विराजमान झाला, अर्थात ज्यांनी शाश्वत जाणले आणि ते सनातन झाले. तुझा विचार काय आहे ते सांग."

गोपीचंद विचारमग्न झाला, "राजवैभव सामर्थ्य नाशवंत आहे; पण योगसामर्थ्य? श्रीगुरुदेव अकरा वर्षे भूगर्भात राहिले, तरी काळ त्यांच्या जवळपासही फिरकू शकला नाही. यम त्यांचा दास आहे. आपण राजवैभवासारख्या गोष्टीत फसू नये. सुवर्ण, संपत्ती प्राप्तीस्तव जन्म घालविण्याऐवजी परीस अथवा कामधेनु प्राप्त करावी. ज्याची ब्रह्मांडावर सत्ता असेल त्याला दारिद्र्य येणार नाही. वैराग्य हाच भाग्योदयाचा शाश्वत मार्ग आहे." असा विचार करून म्हणाला, "गुरुदेव! पेट घातलेल्या अग्नीसारखे आपले विचार धगधगणारे आहेत. आता भौतिक लाभाची आसक्ती राहिली नाही. मला आपल्याप्रमाणे अलौकिक करावे. ज्याप्रमाणे क्षुद्र आळीचा भुंगा होतो त्याप्रमाणे आपण माझा विकास करावा."

श्रीगुरु जालिंदरनाथ राजाचा पाठीवर शाबासकीची थाप मारत म्हणाले; "वाहवा! शाब्बास बेटा. अचूक निर्णय घेतलास." प्रसन्न होऊन मस्तकावर वरदहस्त ठेवला. देहावरून कृपादृष्टी फिरवली कानात गुरुमंत्र सांगितला, अनुग्रह देऊन त्यास सज्ञान केले, मग वडाच्या चिकाने त्याच्या जटा वळल्या. तीनपदरी कौपीन नेसावयास दिले. कानात मुद्रा घातल्या. शैली, कंथा, परिधान केली. शिंगी वाजवावयास लावली. कुबडी फावडी हातात दिली. एक भिक्षेसाठी आणि दुसरी भास्मासाठी अशा दोन झोळया काखेत अडकविल्या. राजाचा कायापालट होऊन आता तो नाथपंथी जोगी शोभू लागला.

हेलापट्टण नगरीत हे वृत्त वाऱ्यासारखे पसरले. राणी वंश्यात हाहाकार उडाला. सोळाशे राण्या शोकसागरात बुडून आकांत करू लागल्या. कोणी धरणीवर अंग टाकून गडबडा लोळू लागल्या. कुणी तोंडात माती घालून घेऊ लागल्या. कुणी महाराणी मैनावतीस शिव्याशाप देऊ लागल्या, "हिनेच घात केला. आमच्या स्वामीला भिकेस लावले. अहो नाथ!! तुम्हा शिवाय या जगात आमचे कुणी नाही. नाथ नाथ!" असा हृदयविदारक आक्रोश होता. दुःखाने दातखीळ बसून मूर्च्छा येऊ लागली. राजाचे गुण आठवून रडू भेकू लागल्या. "चांडाळीण राजमातेने, या राजवैभवाचे वाटोळे केले. आमच्या सुखी संसाराला आग लावली. आमचा प्राणनाथ किती प्रेमळ होता. जरा कुठे चेहऱ्यावर उदासी जाणवली की प्रेमाने जवळ घेऊन चुंबन घेत असे. मनोरथ पूर्ण करीत असे. काय आणि किती गुण गावेत! गाय आपल्या वासराला विसरत नाही, तसा राया आम्हाला विसरत नव्हता. घडोघडी मुख पाहून जात होता. साधी केसाची बट कपाळावर आली तर मायेने सावरत होता. कुंकुमरेषा वक्र झाली तर स्वहस्ते सरळ करीत होता मातेपेक्षाही अधिक ममतेने जतन करीत होता. हे परमेश्वरा! आज तू हे चांगले केले नाहीस. आता आमचे संगोपन कोण करेल? मदनासारखा सुस्वरूप आमचा स्वामी आता आम्ही कुठे पाहणार? आज आमचे भाग्य कसे रुसले? स्वामी, आम्हाला सोडून जाऊ नका वनात टाकून जाऊ नका. असे म्हणत उर बडवून घेत होत्या. धरणीवर मस्तक आपटून आक्रोश करीत होत्या.

श्रीगुरुदेव राजाला म्हणाले, "गोपीचंद! तू आता तपश्चर्येसाठी निघावे. त्याआधी तू तुझ्या स्त्रियांजवळ जाऊन भिक्षा मागावीस आणि तुझा विरक्तपणा पारखून घ्यावा. आम्हालाही तुझी कसोटी पहावयास मिळेल."

अवश्य, गुरुदेव!" असे म्हणून गोपीचंद राणीवंशात आला आणि साद घातली, "अल्लख निरंजन! भिक्षा वाढ माई!!" तो आवाज राण्यांचे हृदय विदिर्ण करीत गेला. एकच आकांत उडाला. आत्यंतिक शोकाने काही जणांची शुद्ध हरपली कुणी तडातड केसांच्या बटा उपटल्या. कुणी तोंडात मातीचे तोबरे भरले. त्यांची शोकग्रस्त अवस्था पाहून धरणीमातासुद्धा शहारली. राण्या रुदन करीत म्हणाल्या, "नाथ, काय हा अवतार केलात? पराक्रमी सूर्य आज केविलवाणा झाला.

वैभवसंपन्न राजा भिक्षुक झाला. शक्तिशाली मेरूमंदारचा क्षुद्र मशक झाला. हे विपरीत पाहवत नाही. लक्षावधी याचकांना दानधर्म करणारे हात आज भिक्षेसाठी पसरले गेले आहेत. याचना करीत आहोत. परमेश्वरा! काय दिवस दाखविलास?"

पट्टराणी कुमावंती पुढे झेपावाली, मागोमाग चंपिका, कारंती व इतर राण्यांनीही गराडा टाकला. शोकाकुळ होऊन विनवणी करू लागल्या, म्हणाल्या, "नाथ ईश्वरी इच्छेने जे झाले ते झाले, परंतु आम्हास सोडून जाऊ नका. येथेच राहून योगसाधना करा. तुमच्याशिवाय आम्हास शोभा नाही. प्राणाशिवाय कुडी काय कामाची? आम्ही तुम्हाला विषयभावनात गुंतवणार नाही. दुरूनच तुमचे दर्शन घेऊ. तुमचे स्वरूप नजरेत साठवू तुमच्या छत्राखाली काळ कंठू तुमच्यासाठी येथेच सोन्याच्या पानांची पर्णकुटी बांधून देऊ. आम्ही सोळाशे स्त्रिया तुमच्या सेवेत राबताना साधनेत काही न्यून येऊ देणार नाही, सोन्याने शिंगी मढवु, रत्नांनी शैली नटवू, कंथ्याला सुवर्ण तार लावू, हिरे, माणके, मोती गुंफून सजवू, तुम्हाला गादी, उशा तकिये आणून देऊ. पूजेसाठी भस्म तयार करून देऊ परंतु तुम्ही इथेच राहावे. भिक्षान्न ऐवजी दुध, दही, तूप, लोणी, पक्वान्न, षड्रसान्न खायला घालू याशिवाय सेवेसाठी दासदासी आहेतच. सुगंधी चंदनलेपाने आपल्या देहास मार्जन करू. तरी क्षणिक भावनेच्या आहारी जाऊन अविचाराने वैभवावर लाथ मारू नका. गडगंज लक्ष्मी आणि प्रेमळ प्रजेचा त्याग करून तीर्थाटनासाठी गेलात तर पदरी दुःखच पडेल, त्याऐवजी येथेच राहून राजवैभवाचा उपभोग घ्यावा आणि योगसाधनाही करावी. मृगाशी, कमलाक्षी, पद्माक्षी, मीनाक्षी, चंद्राननी, गजगामिनी नारी तुमचे तुमचे पदकमल चुरतील तुमच्याशी मधुर भाषण करतील. तरी हे स्वामी वनवासात जाऊ नका. सुखशैय्या सोडून तृणशैय्या धरू नका, या जोगडयांच्या वस्तूंचा त्याग करा." सोळाशे राण्यांचा आक्रोशाने राजाचे मस्तक फिरले.

"दूर व्हा. माझा मार्ग अडवू नका." असं त्याने झिडकारले त्या स्त्रिया पुढे म्हणाल्या,

"नाथ! अरण्यात तुम्ही एकटेच, मग तुमच्याबरोबर बोलणार कोण?''

"सिंगी, सारंगी माझ्याशी मधुर भाषण करतील."

"तेथे आसन, वसन कोण देईल?''

"भूमाता हेच माझे आसन आणि अंबराचे पांघरूण घेईन."

"महाराज! तुमच्याशेजारी कोण शयन करील?

"कुबडी फावडी माझ्या दोन्ही बाजूस शयन करतील."

"तुम्हाला प्रेमाची ऊब देऊन थंडी कोण निवारील?"

"धुनीतील अग्नीपासून मला ऊब मिळेल"

"तेथे दास, दासी, सेवक नसल्याने अन्नपाणी कोण देईल?"

"व्याघ्रासानावर ध्यानस्थ होऊन बसेन, मग जगातले नर नारी भक्तीभावाने अन्नपाणी प्रसाद म्हणून आणून देतील."

"तुमच्याजवळ माता पिता, भगिनी, पुत्र असे प्रेमाचे कोण असेल?"

“आता हे विश्वाच माझे घर, घराघरात माझे माता, पिता, भगिनी, पुत्र नांदत आहेत. तेच माझे सगे, सोयरे, आप्त, स्वकीय.”

“अरण्यात षड्सादी अन्नाचा घास मिळणार नाही.”

“फळे, कंदमुळे हेच आमचे मिष्टान्न.”

कौपीनादी वस्त्रे फाटली तर दुसरी कोठून मिळतील?

“संयमाने वस्त्रे वापरीन. इंद्र्ये आवरून धरीन, पर्णवस्त्रे परिधान करीन.''

‘कंथा फाटल्यावर नवीन कसा मिळणार?''

“योगाशक्तीने दिव्य कंथा निर्माण करीन.”

“शिंगी. सारंगी फुटल्या तुटल्यानानंतर कशा काय वाजतील?”

“ईश्वराच्या सगुण व निर्गुण रूपाच्या शिंगी, सारंगीला आगम, निगमाचे तंतू ओवून दिव्या सुसंवाद करीन.”

“कुबडी फावडी जीर्ण होऊन तुटल्यावर दोन्ही बाजूस कोण शयन करील?”

“खेचरी, भूचरी या योग मुद्रा लावून त्यांच्यामध्ये आत्म स्वरूपात शयन करून निरंजनी डोळा लावीन.”

“शैल्या तुटून गेल्यावर पुन्हा कुठून आणाल?”

“मोक्षमुक्ती समान शैल्य भूषण मिरवीन.”

“कर्ण मुद्रिका हरविल्यानंतर नाथपंथात कसे मिरवाल?”

“खेचरी, भूचरी, लुप्तमुद्रा, अलक्ष, चाचरी, अगोचरी या योगमुद्रा गुरुदेवंनी कर्णात घातल्या आहेत. त्यामुळे अडून बसणार नाही.” अशी हा प्रश्नोत्तर कालापव्यय करू लागली. स्त्रियांच्या प्रश्नाचा भडीमार संपत नाही हे पाहून राजा चिडीच्या स्वरात म्हणाला; “अहो माई! लवकर भिक्षा वाढावी. विलंब होतो आहे.” राजा हट्ट सोडीत नाही हे पाहून सगळयाजणी त्याला मिठीत घ्याला धावल्या. चपळाईने दूर होत, कुबडी फावडी उगारून म्हणाला, “दूर व्हा! दूर व्हा! मला स्पर्श करू नका.”

राजमाता मैनावती भिक्षेची ताट सज्ज करून आली म्हणाली, “जोगी गोपीचंद ही भिक्षा स्वीकारावी.” झोळीत भिक्षा घेऊन मातेच्या चरणांवर माथा टेकवून वंदन केले. “अल्लख निरंजन” अशी गर्जना करून गर्रकन वळला आणि श्रीगुरुंजवळ येऊन घडलेला वृतांत सांगितला. मागोमाग आलेल्या राजमातेनेही त्यास दुजोरा दिला. गुरुदेव अतिशय प्रसन्न झाले. तीन दिवस रात्र अखंडपणे चर्चा करून अनेक प्रकारचे दिव्य उपदेश केले.

राजा गोपीचंदाने नाथपंथ स्वीकारल्याने रिक्त झालेल्या राजसिंहासनास तसेच ठेवणे हितकारक नसल्याने श्रीगुरुदेवांनी कुमावंतीचा पुत्र मुक्तचंद याचा राज्याभिषेक केला. प्रजेला राजा मिळाला. मग श्रीगुरू गोपीचंदास म्हणाले, “मोहाची

बंधने नाजूकपणे तोडल्यास तुटत नाहीत. त्याकरिता शीघ्र निर्णय घेऊन तपासाठी बद्रीकाश्रामात जावे. श्री बद्रीकेदारेश्वाराला वंदन करून तपारंभ करावा. लोहाच्या तीक्ष्ण खिळयावर पायाचा अंगठा ठेवून, ईश्वर चिंतनात एकाग्रतेने बारा वर्षाचे तप पूर्ण करावे."

राजवैभवासारख्या लौकिक अर्थाने अशाश्वत आयुष्याच्या आणि मर्त्य जगात न फसता परिवर्तीत झालेला गोपीचंद आता अलोकिक मोहिमेवर निघाला आहे. त्याला नितोप देण्यासाठी स्वतः श्रीगुरु जालिंदरनाथ कानिफनाथ, मैनावती, मुक्तचंद अश्रू ढालणारे प्रजाजन राजाबरोबर निघाले. सोळाशे राण्याच्या आक्रोशाने राजवाड्याच्या चिरेबंदी भिंतीसुद्धा थरथरल्या. घराघरातील पदपंथावरील नागरिक अश्रू ढाळीत. राजाचे गुण गात आहेत पावलापावलागणिक राजाच्या प्रयाणाचे अंतर वाढत चालले होते आणि ऐश्वर्य स्तब्धपणे मागे पडत चालले. टाचा उंचावून, उच्चस्थानी, इमारतीच्या गच्चीवर चढून प्रजाजन आपल्या लाडक्या राजाला निरोप देत, डोळे भरून शेवटचे पहात होते. एक कोस अंतरापर्यंत साथ संगत करून मंडळी परत आली. भव्य राजवाडा, मुख म्लान करून दीनवाणेपणाने उभा होता.

श्री जालिंदरनाथांनी शोकाकुल जनतेचे सांत्वन करून त्यांना आपापल्या घरी पाठविले. अंतःपुरात जाऊन सर्व राण्यांची समजूत घातली. मुक्तचंदाचा हात मैनावतीच्या हातात देऊन म्हणाले, "आता यालाच गोपीचंद समजून सांभाळा, हे सुद्धा मोठा पराक्रमी होऊन तुमचे आणि प्रजाजनांचे मनोरथ पुरवील." मुक्तचंदाच्या हस्ते याचकांना धनदान करविले. तहत सहा महिने जालिंदरनाथ आणि कानिफनाथ तेथे राहिले आणि राज्याची विस्कळीत झालेली घडी बसवून तेथे स्थैर्य निर्माण केले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने योगसिद्धी प्राप्त होऊन सन्मार्ग प्राप्त होईल.